**राज्यातील कृषी विद्यापीठांतर्गत कृषी तंत्रनिकेतन अभ्यासक्रमासंदर्भात मार्गदर्शक तत्वे व निकषामध्ये सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्र. मकृप२०१२/प्र.क्र.१०३/७अे**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक- १८ जून, २०१५**

<u>संदर्भ:</u>- (१) कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग, शासन निर्णय क्र. मकृप २०१२/प्र.क्र.१०३/७-अे, दि. २१/६/२०१२

(२) कृषी परिषद कार्यालयाचे पत्र जा.क्र.मकृप/शिक्षण-१/१०१५/१११८, दि.२०/५/२०१५

(३) कृषी परिषद कार्यालयाचे पत्र जा.क्र. मकृप / शिक्षण-१ / १०१५ / १३३१, दि.१८ जून, २०१५.

<u>प्रस्तावना :-</u>

राज्यातील कृषी विद्यापीठांतर्गत खाजगी संस्थांमार्फत कायम विना अनुदानित तत्वावर चालू असलेल्या कृषी तंत्र विद्यालयांचा अभ्यासक्रम उन्नत करून अर्ध इंग्रजी (Semi English) माध्यमात कृषी तंत्र निकेतन अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०१२-१३ पासून सुरु करण्यात आला आहे. यासंदर्भात दि.२१.०६.२०१२ व दि.२६.०५.२०१५ अन्वये निश्चित करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वे व निकषांमध्ये सुधारणा करण्याविषयीचा प्रस्ताव कृषि परिषदेकडून उपरोक्त संदर्भाधीन क्र.३ अन्वये शासनास प्राप्त झाला होता त्यानुसार या प्रकरणी खालीलप्रमाणे शासन निर्णय घेण्यात येत आहे.

<u>शासन निर्णय</u>

दि.२१.०६.२०१२ च्या शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वे व निकष क्रमांक ८ उपरोक्त दि.२६.०५.२०१५ च्या शासन निर्णयान्वये रद्द करण्यात आला होता. सदर निकष क्र.८ याद्वारे पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे. **"कृषि तंत्र निकेतन उत्तीर्ण (खुल्या प्रवर्गासाठी किमान ६० टक्के व मागास प्रवर्गांसाठी किमान ५० टक्के गुणधारक) होणारे विद्यार्थी कृषि पदवी (B.Sc.[Agri.]) अभ्यासक्रमाच्या द्वितीय वर्षाच्या प्रवेशास पात्र होतील. द्वितीय वर्षात प्रवेश देतांना प्रवेशक्षमतेच्या २० टक्के अतिरिक्त जागा राखीव राहतील. सदर जागा शासनाच्या राखीव जागांबाबतचे नियम लक्षात घेऊन व गुणानुक्रमे भरण्यात येतील."** हा मजकूर टाकण्यात येत आहे.

२. उपरोक्त दि.२६.०५.२०१५ च्या शासन निर्णयातील मुद्दा क्र.९ पुढीलप्रमाणे सुधारीत करण्यात येत आहे. **"कृषी तंत्र निकेतन उत्तीर्ण असलेले उमेदवार कृषी पदवी (B.Sc.[Agri.]) अभ्यासक्रमाच्या पहिल्या वर्षात प्रवेशासाठी पात्र असतील. या उमेदवारांसाठी** प्रवेशक्षमतेच्या **१० टक्के अतिरिक्त जागा असतील. सदर जागांवर राखीव** जागांबाबत शासनाने **नियम लक्षात घेऊन व गुणानुक्रमे प्रवेश देण्यात येतील."**

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१५०६१८१७३९१४०८०१ असा आहे. हाआदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षाकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamlakar
Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2015.06.18 17:44:26 +05'30'

**(क.य.वंजारे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल-नि-कुलपती, (कृषी विद्यापीठे) यांचे सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. कृषी मंत्री / मा. राज्यमंत्री (कृषी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. उपाध्यक्ष, महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, पुणे
५. प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
६. सचिव (पदुम), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७. सचिव (ग्रामविकास विभाग), मंत्रालय, मुंबई
८. सचिव (माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण), शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई
९. महासंचालक, महाराष्ट्र कृषी शिक्षण व संशोधन परिषद, सर्व्हे क्र. १३२/ब, भांबुर्डा, भोसलेनगर, पुणे ४११ ००७.
१०. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषी विद्यापीठ, अकोला
११. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक महात्मा फुले कृषी विद्यापीठ, राहुरी
१२. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक वसंतराव नाईक मराठवाडा कृषी विद्यापीठ, परभणी
१३. कुलगुरु / कुलसचिव / नियंत्रक डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषी विद्यापीठ, दापोली
१४. आयुक्त, कृषी / पशुसंवर्धन / मत्स्य व्यवसाय / दुग्धव्यवसाय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१५. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१६. महालेखापाल, १/२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
१७. महालेखापाल, १/२ (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
१८. सर्व कृषी तंत्र निकेतने (संबंधित विद्यापीठांमार्फत)
१९. सर्व उपसचिव / अवर सचिव / कार्यासन अधिकारी, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई